मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल करावयाच्या याचिकेसंबंधित सूचना.

**महाराष्ट्र शासन**

**विधी व न्याय विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२८१५/प्र.क्र.१५१ /१५/का.८**

मादाम कामा रोड, मुख्य इमारत, पाचवा मजला,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ८/१०/२०१५.

## परिपत्रक

सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली या कार्यालयाद्वारे मा. सर्वोच्च न्यायालयात महाराष्ट्र शासनाच्या वतीने विविध प्रशासकीय विभागांतर्गत दिवाणी व फौजदारी प्रकरणांमध्ये विशेष अनुमती याचिका (SLP) व दिवाणी/फौजदारी अपील दाखल करण्यात येतात. मा. सर्वोच्च न्यायालयात याचिका दाखल करतेवेळी होणारा विलंब टाळण्यासाठी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१) मंत्रालयीन प्रशासकीय विभागांकडून विशेष अनुमती याचिका (SLP) व दिवाणी/फौजदारी अपील दाखल करावे किंवा कसे या अभिप्रायासाठी प्राप्त प्रस्ताव तपासून योग्य त्या अभिप्रायांसह तात्काळ संबंधित विभागास परत पाठवावेत व कोणत्याही परिस्थितीत प्रस्ताव विधि व न्याय विभागत सात दिवसांपेक्षा जास्त प्रलंबित राहता कामा नये.

१) विशेष अनुमती याचिका (SLP) व दिवाणी/फौजदारी अपील दाखल करण्यासंदर्भातील अनौपचारीक संदर्भ ई-मेलद्वारे संबंधित प्रशासकीय विभागास पाठवावेत.

२) सहसचिव, विधि व न्याय विभाग, नागपूर/औरंगाबाद यांनी प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग यांच्या मान्यतेस्तव प्रस्ताव सादर करताना होणारा विलंब टाळण्यासाठी ई-मेल द्वारे तसेच शिघ्र टपालाने प्रस्ताव पाठवावा व तसा प्रस्ताव पाठविल्याचे ई-मेलद्वारे अलहीदा कळवावे. तसेच शक्य त्या प्रकरणात संपूर्ण प्रस्तावच ई-मेलद्वारे कागदपत्र स्कॅन करून पाठवावेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००८१५३७४३२२१२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

N J Jamadar

Digitally signed by N J Jamadar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Secretary And Senior Legal Advisor, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1a04c87922c611cd86db0417549c441857561c576c21b21f3c8d180884505e, cn=N J Jamadar
Date: 2015.10.08 15:38:52 +05'30'

**( एन. जे. जमादार )**

प्रधान सचिव व विधि परामर्शी

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई.

२. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.

३. सहसचिव/उपसचिव (विधि), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

४. सहसचिव, विधि व न्याय विभाग, नागपूर/औरंगाबाद.

५. निवडनस्ती.